मा. न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांचेकरिता खाजगी बंगला, शासकीय निवासस्थान म्हणून भाडेतत्वावर घेण्यास मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एचसीटी-५२१७/६४८/प्र.क्र.७४/का.चार**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३० जून, २०१८.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय समक्रमांक दि. ३१/०७/२०१७
२) प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांची पत्रे क्र. CK/८६११/२०१८, दि. २१/०६/२०१८ व क्र. ८९३८, दि. २७/०६/२०१८.
३) विभागीय आयुक्त तथा अध्यक्ष शासकीय निवासस्थान वाटप समिती, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र. २०१८/सा.प्र./संकीर्ण/निवास/कावि-२४२, दि. २७/०६/२०१८

**प्रस्तावना :-**

औरंगाबाद या ठिकाणी उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमूर्तींच्या दर्जानुरुप शासकीय निवासस्थानाची अनुपलब्धता विचारात घेऊन मा. न्या. श्री. एस. एम. गव्हाणे यांचेकरिता प्लॉट क्र. ३५६, सेक्टर N-१, सिडको, औरंगाबाद येथील खाजगी बंगला शासकीय निवासस्थान म्हणून भाडेतत्वावर घेण्यास संदर्भाधीन दि. ३१/०७/२०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुषंगाने करण्यात आलेला ११ महिन्यांचा भाडेकरार दि. ३०/०६/२०१८ रोजी संपुष्टात येत आहे. सद्यस्थितीत औरंगाबाद या ठिकाणी मा. न्यायमूर्तींकरिता त्यांच्या दर्जानुरुन शासकीय निवासस्थान उपलब्ध नसल्याने उच्च न्यायालय प्रशासनाने उक्त खाजगी बंगल्याच्या भाडेकरारास पुढील ११ महिन्यांसाठी मुदतवाढ देण्याचा निर्णय घेतला आहे. विभागीय आयुक्त तथा अध्यक्ष शासकीय निवासस्थान वाटप समिती, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भाधीन दि.२७/०६/२०१८ च्या पत्रान्वये औरंगाबाद या ठिकाणी सद्यस्थितीत उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमूर्तींच्या दर्जानुरुप शासकीय निवासस्थान उपलब्ध नसल्याचे प्रमाणित केले आहे. तसेच सदर खाजगी बंगल्याचे मालक श्री. भरतेंदु वत्स यांनी भाडेकरारातील कलम १४ व १५ येथील तरतुदीनुसार सदर मुदतवाढीस मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन सदर खाजगी बंगल्याच्या भाडेकरारास पुढील ११ महिन्यांसाठी मुदतवाढ देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार प्रस्तुत प्रकरणी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

औरंगाबाद या ठिकाणी उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमूर्तींच्या दर्जानुरुप शासकीय निवासस्थानाची अनुपलब्धता विचारात घेऊन मा. न्या. श्री. एस. एम. गव्हाणे यांचेकरिता श्री. भरतेंदू वत्स यांचा प्लॉट क्र. ३५६, सेक्टर N-१, सिडको, औरंगाबाद येथील खाजगी बंगला शासकीय निवासस्थान म्हणून भाडेतत्वावर घेण्यास दि. ३१/०७/२०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर भाडेकरारास पुढील ११ महिन्यांसाठी म्हणजेच दि. ०१/०७/२०१८ ते दि. ३१/०५/२०१९ पर्यंत सदर शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात येत आहे. तसेच मूळ भाडेकरारातील तरतूदीनुसार १०% भाडेवाढ परिगणित करुन दरमहा रु. ६०,५००/- या दराने येणाऱ्या खर्चास देखील मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त भाडेकरार करण्यासाठी शासनाच्या वतीने सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. याप्रित्यर्थ होणारा आवर्ती खर्च " मागणी क्र.जे-१, २०१४ - न्यायदान, १०२-उच्च न्यायालये, (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा, (अनिवार्य) (२०१४ ००९२) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखालील आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय हा वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग तीन, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदा खालील परिच्छेद क्र. २७ (२)(अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२१२४७५४४३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra D Sawant

Digitally signed by Rajendra D Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6c5df198d588de75e335db20487f4df45c73eca4ce5875cd77fd8b1924a3fdf8, serialNumber=997cb12aac35c749b0ddeeaa870ff7ec4f5bd55e7f751d37a63fbc967395f74e, cn=Rajendra D Sawant
Date: 2018.07.02 12:49:09 +05'30'

**( राजेंद्र सावंत )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२) प्रबंधक (अपील शाखा), उच्च न्यायालय, मुंबई
३) प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद
४) सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद (परिच्छेद २ मध्ये नमूद निदेशानुसार कार्यवाही करण्याच्या विनंतीसह)
५) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
६) वरिष्ठ कोषागार अधिकारी, औरंगाबाद
७) श्री. भरतेंदू वत्स, प्लॉट क्र. ३५६, सेक्टर N-१, सिडको, औरंगाबाद
८) विधि व न्याय विभाग, कार्यासन २३, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती.